(२१८) 20150422170943052 7

**कुऱ्हा लघु पाटबंधारे योजना ता.भुसावळ, जि.जळगाव या योजनेस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांक : लपायो २००८/(४९/२००८) खारभूमी

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- १६/७/२००८

**पहावे :-** कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र क्र.कासं/प्रशा-४/२३२/२००८, दिनांक १.२.२००८

**प्रस्तावना :-**

कुऱ्हा लघु पाटबंधारे योजना ता.भुसावळ, जि.जळगाव या योजनेस शासन निर्णय क्रमांक लपायो १६९५/४६०/९५/खारभूमी दिनांक १३.८.१९९६ अन्वये रुपये २२७.६४ लक्ष इतक्या रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तदनंतर शासन निर्णय क्रमांक लपायो/२००१/९६१/(२९५/२००१) खारभूमी दिनांक ४.१०.२००१ अन्वये रूपये ३८१.६१ लक्ष रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. प्रकल्पाच्या धरणाचे मातीकाम घळभरणीसह पूर्ण झाले आहे. सांडव्याचे काम प्रगतीपथावर आहे. दरसुचीतील दरातील फरक, संकल्पचित्र बदल, अंदाजपत्रकातील बदल, भू संपादन किंमतीतील वाढ इत्यादी कारणामुळे योजनेच्या किंमतीत वाढ अपेक्षित असल्याने सन २००७-२००८ च्या दरांवर आधारीत रुपये ९५७.०४ लक्ष किंमतीच्या प्रकल्पास व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांच्याकडून प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये कुऱ्हा लघु पाटबंधारे योजना ता.भुसावळ, जि.जळगाव या योजनेस सन २००७-२००८ वर्षाच्या दरसूचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रुपये ९,५७,०४,१३४/- (रुपये नऊ कोटी, सत्तावन लक्ष, चार हजार, एकशे चौतीस फक्त) यापैकी रुपये ७,९४,०५,६०५/- कामाप्रित्यर्थ व रुपये १,६२,९८,५२९/- अनुषंगिक खर्च रकमेस व्दितीय प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधां-यावरील भांडवली खर्च ८०० इतर खर्च (१) बांधकामे ल.पा.योजना, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तापी पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान योजनांतर्गत (संगणक सांकेतांक क्र. ४७ ०२ ४९० ९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व चालू आर्थिक वर्षात तापी पाटबंधारे विकास महामंडळाकडे उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून परस्पर भागविण्यात यावा.

F:\Maahegoen-order-HHP..doc

हा शासन निर्णय शा.नि.क्र. संकिर्ण १०९९/(१२६/९९) मोप्र (प्र) दिनांक १८.५.९९ मधील तरतूदीनुसार आंतरवित्त सल्लागार व उपसचिव जलसंपदा विभाग यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता (१६/०८) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( रा.च.हुमणे )**
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-३२
नियोजन विभाग, (१४६१), मंत्रालय, मुंबई-३२
कार्यकारी संचलाक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अधीक्षक अभियंता, जळगाव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगाव
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जळगाव
उप अभियंता, (खारभूमी) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रायल, मुंबई
जिल्हाधिकारी, जळगाव
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रायल, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

(23)

\Maahegoen-order-HHP..doc

शासन निर्णय क्रमांक लपायो २००८/प्र.क.(४९/२००८) खारभूमी दिनांक १६/७/२००८ चे

## परिशिष्ट

### कुऱ्हा लघु पाटबंधारे योजना ता.भुसावळ, जि.जळगाव अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | शिर्ष / उपशिर्ष | रक्कम (रुपये लक्ष) | | एकूण रुपयात |
|---|---|---|---|---|
| | | शिर्षकामे | मुख्य व शाखा कालवे | |
| १. | 'ए' प्राथमिक | ३८३८७ | २७०२६६ | ३०८६५३ |
| २. | 'ब' (भूसंपादने) | १४४२१४८३ | ४२७४११ | १४८५६३७४ |
| ३. | 'सी' मुख्य कामे | ५२३०२८०७ | -- | ५२३०२८०७ |
| ४. | 'डी' विमोचक | १०३६७८८ | ६१७५६३ | १६५४३५१ |
| ५. | 'ई' फॉल | -- | ६८३४१६ | ६८३४१६ |
| ६. | एफ आरएचटी वर्क्स | -- | ७९५१३६ | ७९५१३६ |
| ७. | जी पूल (सीटी क्रॉसिंग) | -- | ७०३१२४ | ७०३१२४ |
| ८. | एच एस्केप | -- | १११२४० | १११२४० |
| ९. | 'के' इमारती | १००००० | १०००० | ११०००० |
| १०. | एल मातीकाम | -- | २२१२८०२ | २२१२८०२ |
| ११. | एम वृक्षारोपन | -- | १०००० | १०००० |
| १२. | 'ओ' संकिर्ण | ६७९०७५ | २५००० | ७०४०७५ |
| १३. | 'पी' देखभाल | २६१५१४ | ५०००० | ३११५१४ |
| १४. | 'आर' दळणवळण | २५८५४३३ | -- | २५८५४३३ |
| १५. | क्षतिरिका | -- | २०५६००० | २०५६००० |
| | कामाप्रित्यर्थ किंमत | ७१४३३४८७ | ७९७२११८ | ७९४०५६०५ |
| | आनुषंगिक खर्च | | | १६२९८५२९ |
| | योजनेची एकूण किंमत | | | ९५७०४१३४ |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | २५७ हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा सघमी | २९३६.७० सघमी |
| पाणीसाठ्याची द.ल.घ.मी. किंमत (रु.) | रू. [illegible]८९ < रू.३६२७९ (मापदंडात बसते) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.४७ > १.०० (मापदंडात बसते) |